**महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर या महामंडळाच्या सेवेत दिनांक ०१.०४.२००८ पासून कार्यरत असलेल्या ५२ कर्मचा-यांना दि. १.१.१९९६ ते दि. ३१.०३.२००८ या कालावधीच्या थकबाकी एवढी रक्कम सानुग्रह अनुदान स्वरुपात अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : हातमाग-२०१८/प्र.क्र.१२३/टेक्स-३**
नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०२३.

**वाचा :**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३ दिनांक ०४ एप्रिल, २०२२.
३) वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे जा.क्र./कार्या-५(२)/हातमाग/ महामंडळ ५ वे ६ वेतन संबंधी / २८४८ /२०२२, दिनांक २४ मे, २०२२ चे पत्र.
४) मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांचे दिनांक १४.१२.२०२१ चे आदेश.
५) शासन निर्णय क्र. हातमाग-२०१८/प्र.क्र.१२३/टेक्स-३ दि. १० मार्च, २०२३

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर यांच्या आस्थापनेवरील कर्मचा-यांना दिनांक ११ फेब्रुवारी, २०१० च्या शासन निर्णयान्वये पाचव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी दि. १.०४.२००८ पासून लागू करण्यात आली आहे. सदर दि. ११.०२.२०१० रोजीच्या शासन निर्णयात ५ व्या वेतन आयोगाबाबत नमूद केलेल्या ६ अटींपैकी अट क्र. २ नुसार वेतननिश्चिती संबंधीच्या फरकाची दि. १.४.२००८ पूर्वीची कोणतीही थकबाकी अनुज्ञेय राहणार नसली तरीही तत्कालीन मा. मुख्यमंत्री महोदयांनी मानवतेच्या दृष्टिकोनातून दिलेल्या निर्देशास अनुसरुन तसेच मंत्रिपरिषद बैठकीत दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने खास बाब म्हणून महामंडळातील ४२३ कर्मचा-यांपैकी फक्त ३७१ सेवानिवृत्त/स्वेच्छासेवानिवृत्त कर्मचा-यांना ५ व्या वेतन आयोगाची थकबाकी सानुग्रह अनुदान स्वरुपात अदा झाली.

त्यामुळे उर्वरित महामंडळातील कार्यरत ५२ कर्मचारी यांना उक्त शासन निर्णयातील अट क्र. २ लागू असल्यामुळे त्यांना पाचव्या वेतन आयोगाची थकबाकीचा लाभ झाला नाही. पाचव्या वेतन आयोगाच्या थकबाकी संदर्भात सदर महामंडळातील ४२३ कर्मचा-यापैकी ३७१ कर्मचारी यांच्याबाबतीत “सानुग्रह अनुदान” व उर्वरित ५२ कार्यरत कर्मचारी यांना “थकबाकी” अशा शब्दप्रयोगामुळे सदर कर्मचा-यांमध्ये भेदभाव निर्माण झाला. त्यामुळे सदर थकबाकी

मिळणेसंदर्भात ५२ कार्यरत कर्मचारी यांनी मा. उच्च न्यायालयात याचिका दाखल केली. प्रस्तुत याचिकेबाबत मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठाने दिनांक १४.१२.२०२१ ला सदरची याचिका निकाली काढून या ५२ कर्मचा-यांना महाराष्ट्र शासनाने सेवानिवृत्त व स्वेच्छासेवानिवृत्त झालेल्या ३७१ माजी कर्मचा-यांना ज्याप्रमाणे ५ वे वेतन आयोगाच्या फरकाचे लाभ “सानुग्रह अनुदान” स्वरुपात अदा केले त्यानुसार निर्णयाचे तारखेपासून ६ महिन्याच्या आत अदा करण्याचे वाचा क्र. ४ अनुसार आदेश दिलेले आहेत.

वरील अनुषंगाने सदर न्यायालयीन निर्णयाच्या अधिन राहून महामंडळातील ५२ कर्मचाऱ्यांना ५ व्या वेतन आयोगाची थकबाकी रु. १,६०,७८,२२३/- इतकी रक्कम “सानुग्रह अनुदान” स्वरुपात अदा करणे आवश्यक आहे. त्यामुळे महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर या महामंडळाच्या सेवेत दिनांक ०१.०४.२००८ पासून कार्यरत असलेल्या ५२ कर्मचाऱ्यांना दि. ०१.०१.१९९६ ते दि. ३१.०३.२००८ या कालावधीच्या पाचव्या वेतन आयोगाच्या थकबाकी एवढी रु.१,६०,७८,२२३/- इतकी रक्कम सानुग्रह अनुदान स्वरुपात अदा करण्याबाबत दि. २ मार्च, २०२३ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत विचारविनिमय होऊन झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने दि.१० मार्च २०२३ रोजीच्या शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर येथील सेवानिवृत्त/ स्वेच्छासेवानिवृत्त ३७१ कर्मचा-यांना दिनांक ०१.०१.१९९६ ते दि. ३१.०३.२००८ या कालावधीतील ५ व्या वेतन आयोगाच्या फरकाची थकबाकी खास बाब म्हणून ज्याप्रमाणे “सानुग्रह अनुदान” स्वरुपात अदा केली त्याप्रमाणे हातमाग महामंडळातील कार्यरत ५२ कर्मचाऱ्यांना पाचव्या वेतन आयोगाच्या थकबाकी रु. १,६०,७८,२२३/- (अक्षरी- रुपये एक कोटी साठ लाख अठ्ठयाहत्तर हजार दोनशे तेवीस फक्त) इतकी रक्कम सानुग्रह अनुदान स्वरुपात वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये उपरोक्त बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील परिच्छेद-४ ते १९ पैकी परिच्छेद ८,१९ सदर प्रकरणी लागू असून उर्वरित परिच्छेद ४, ५, ६, ७, ९, १०, ११, १२, १३, १४, १५, १६, १७, १८, या प्रकरणी लागू नाहीत. तसेच दि. ०४.०४.२०२२ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या सर्व संबंधित बाबींची पूर्तता होत आहे.परिच्छेद-८ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, शासनाद्वारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहिल. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पध्दतीने वितरीत करण्यात येऊ नये. परिच्छेद-१९ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, खर्च करतांना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली व सर्व अटी/शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांची राहील.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँका/ वित्तीय संस्थांना वितरीत

करताना आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रक्कम प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६ मध्ये कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाच्या दक्षतेबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. सदर परिपत्रकातील परिच्छेद-अ) मधील बाबींची प्रस्तुत प्रकरणाशी संबंधित माहिती खालीलप्रमाणे आहे-

**१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाच्या सेवेत दिनांक ०१.०४.२००८ पासून कार्यरत असलेल्या ५२ कर्मचा-यांना ५ व्या वेतन आयोगानुसार दि. ०१.०१.१९९६ पासून दिनांक ३१.०३.२००८ पर्यंतच्या कालावधीच्या थकबाकी एवढी रक्कम रुपये १,६०,७८,२२३/- (रुपये एक कोटी साठ लाख अठ्ठयाहत्तर हजार दोनशे तेवीस फक्त) सानुग्रह अनुदान स्वरुपात अदा करण्यास शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत.

**२) मंजूर निधी** :- मागणी क्र. व्ही-२, २८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०१) (०७) महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर येथील कर्मचा-यांना पाचव्या वेतन आयोगाच्या थकबाकीची रक्कम अदा करण्यासाठी अनुदान (२८५११६७०७), ३३, अर्थसहाय्य, (अनिवार्य) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत रु. १,६०,७८,२२३/-इतकी तरतूद मंजुर करण्यात आलेली आहे.

**३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे** :- लागू नाही.

**४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरित करण्यात येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही** :- लागू नाही.

**५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे** :- लागू नाही.

**६) वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे** :- लागू नाही.

**७) बांधकामविषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिका-याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा** :- लागू नाही.

**८) खरेदी विषयक अद्ययावत प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग III / उद्योग-४, दि. १.१२.२०१६ च्या शासन आदेशानुसार करावी:- लागू नाही.**

**९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी** :- लागू नाही.

५. मागणी क्र. व्ही-२, २८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०१) (०७) महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर येथील कर्मचा-यांना पाचव्या वेतन आयोगाच्या थकबाकीची रक्कम अदा करण्यासाठी अनुदान (२८५११६७०७), ३३, अर्थसहाय्य, (अनिवार्य) (दत्तमत) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या रु. १,६०,७८,२२३/-( रुपये एक कोटी साठ लाख अठ्ठयाहत्तर हजार दोनशे तेवीस फक्त ) इतकी

रक्कम नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांच्याकडे सुपूर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. सदर रक्कम जिल्हा कोषागार, नागपूर येथून काढण्यासाठी आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांचे कार्यालयातील सहाय्यक संचालक (लेखा) यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी.

७. सदरहू रक्कम मागणी क्र. व्ही-२, २८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०१) (०७) महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर येथील कर्मचा-यांना पाचव्या वेतन आयोगाच्या थकबाकीची रक्कम अदा करण्यासाठी अनुदान (२८५११६७०७), ३३, अर्थसहाय्य, (अनिवार्य) (दत्तमत) या लेखाशीर्षाखालील सन २०२२-२३ या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावा.

८. प्रमाणित करण्यात येते की, सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बॅक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.

९. या योजनेचा निधी खर्च करतांना वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेत नमूद वित्तीय अधिकारांचे पालन करण्यात यावे. तसेच यासंबंधी शासनाच्या मार्गदर्शक सूचना व नियमांचे पालन कटाक्षाने करण्यात यावे.

१०. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

११. सदर शासन निर्णय विधी व न्याय विभाग आणि नियोजन विभागाशी विचारविनिमय करुन तसेच वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक २८/२०२३/व्यय-२, दिनांक १६.०१.२०२३ या अन्वये दिनांक ०३.०२.२०२३ रोजी वित्त विभागाने दिलेल्या सहमतीने व दिनांक ०२.०३.२०२३ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१४१७३४०७२५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2023.03.14 17:38:53 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४) मा. मंत्री (वस्त्रोद्योग), यांचे खाजगी सचिव
५) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई
७) सर्व मा.विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
८) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर
१५) महालेखाकार (लेखा परिक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर
१६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर.
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर.
१९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
२०) कार्याध्यक्ष, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ कर्मचारी संघर्ष संघटना, नागपूर.
२१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२१) अवर सचिव (१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवड नस्ती ( टेक्स-३ ).